सन २०१९-२० या प्रतिवेदन वर्षासाठी राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे कार्यमूल्यमापन अहवाल लिहिण्यासाठी सुधारित वेळापत्रक.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : सीएफआर १२२०/प्र.क्र. ३२/का.१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २३ एप्रिल, २०२०

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : सीएफआर १२११/ प्र.क्र.२५७/१३, दि. ०२.०२.२०१७

**शासन परिपत्रक :-**

सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे कार्यमूल्यमापन अहवाल लिहिण्याबाबत दि. ०२.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये वेळापत्रक निश्चित करण्यात आले आहे.

२. तथापि, महाराष्ट्र राज्यात उद्भवलेल्या कोरोना (COVID-१९) विषाणूच्या पार्श्वभूमीवर राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या कार्यालयातील उपस्थितीबाबत वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार शासकीय कार्यालयाचे कामकाज सुरु ठेवण्यात येत आहे. त्यामुळे सन २०१९-२० चे कार्यमूल्यमापन अहवालाचे प्रतिवेदन व पुनर्विलोकनाची कार्यवाही उक्त शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या वेळापत्रकानुसार विहीत कालावधीत करणे शक्य होणार नाही.

३. सबब, सन २०१९-२० चे कार्यमूल्यमापन अहवाल लिहिण्यासाठी खालीलप्रमाणे सुधारित वेळापत्रक निश्चित करण्यात येत आहे. तसेच सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी देखील खालील वेळापत्रक लागू राहील.

| कार्य | यापूवी निश्चित करण्यात आलेली अंतिम तारीख | सुधारित अंतिम तारीख |
|---|---|---|
| विभाग/कार्यालयाच्या संस्करण अधिकाऱ्यांनी/आस्थापना अधिकाऱ्यांनी कार्यमूल्यमापन अहवालातील भाग-१ भरुन कार्यमूल्यामापन अहवालाचा नमुना अधिकारी/कर्मचारी यांना देणे. | मार्च महिन्याचा शेवटचा आठवडा ते १ एप्रिल | जून, २०२० चा शेवटचा आठवडा ते १ जुलै, २०२० |

| | | |
|---|---|---|
| स्वयंमुल्यनिर्धारण | १५ एप्रिल | १५ जुलै, २०२० |
| प्रतिवेदन अधिकाऱ्यांचे मूल्यमापन | ३० एप्रिल | ३१ जुलै, २०२० |
| पुनर्विलोकन अधिकाऱ्यांचे मूल्यमापन | १५ मे | १५ ऑगस्ट, २०२० |
| संबंधित अधिकाऱ्यांस प्रत उपलब्ध करुन देणे | ३० जून | ३० सप्टेंबर, २०२० |

४. सन २०१९-२० चे कार्यमूल्यमापन अहवाल लिहिण्याचे उक्त वेळापत्रक विचारात घेता, राज्य शासकीय अधिकाऱ्यांचे सन २०१९-२० चे कार्यमूल्यमापन प्रतिवेदित/पुनर्विलोकित न केल्यामुळे १ जुलै, २०२० रोजी देय होणारी वेतनवाढ रोखण्यात येऊ नये.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२००४२३१४४८१५८७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Prasad Joshi

Digitally signed by Smita Prasad Joshi

( स्मिता जोशी )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव. राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
६. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०.मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य.
११.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२.प्रबंधक, अपील शाखा,उच्च न्यायालय, , मुंबई.
१३. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
१४. प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय,

१५. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१७. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१८. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई
१९. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई
२०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१.सर्व विभागीय आयुक्त,
२२.सर्व जिल्हाधिकारी,
२३.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२४.सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख/प्रादेशिक प्रमुख/कार्यालय प्रमुख.
२५. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
२६.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
२७. निवडनस्ती.